**श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी ता.कामठी,**
**जि.नागपूर या तीर्थस्थळाचा विकास करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवी-२०१५/प्र.क्र.१६/१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय,मुंबई
तारीख: २६ मे, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः नागपूर सुधार प्रन्यास चे पत्र क्र.का.अ/(गृहनिर्माण)/ch/४४१,दिनांक ३ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी ता.कामठी, जि.नागपूर या तीर्थस्थळाचा विकास करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच या तीर्थक्षेत्र विकास आराखड्याची आखणी व अंमलबजावणी नागपूर सुधार प्रन्यास यांच्या मार्फत करण्याची तसेच शासन पातळीवर सदर आराखडा नगर विकास विभागाच्या नियंत्रणाखाली ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी ता.कामठी, जि.नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखडा तयार करण्यासाठी व आराखड्यास शिखर समितीने मान्यता दिल्यानंतर मान्य केलेल्या खर्चाच्या अधिन राहून आराखड्याची अंमलबजावणी करण्यासाठी नागपूर सुधार प्रन्यास यांना नोडल एजन्सी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

२. सदर आराखड्याच्या अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे प्रशासकीय कार्यपध्दती असणार आहे.

अ) तीर्थक्षेत्र विकास आराखडयास अंतिम मान्यता देण्यासाठी राज्यस्तरीय शिखर समिती खालीलप्रमाणे गठित करण्यात येत आहे.

**शिखर समिती**

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा.मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री, वित्त, नियोजन | उपाध्यक्ष |
| ३ | नागपूर जिल्हयाचे मा.पालकमंत्री | सदस्य |
| ४ | मा.राज्यमंत्री, वित्त व नियोजन | सदस्य |
| ५ | नागपूर जिल्ह्यातील संबंधित संसद सदस्य/ विधान सभा/विधान परिषद सदस्य | सदस्य |
| ६ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | सदस्य |
| ७ | अध्यक्ष, नागपूर जिल्हा परिषद, नागपूर | सदस्य |

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| ८ | मुख्य सचिव | सदस्य |
| ९ | अपर मुख्य सचिव ( वित्त ) | सदस्य |
| १० | प्रधान सचिव ( नियोजन ) | सदस्य |
| ११ | आराखड्याशी संबंधित विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव | सदस्य |
| १२ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| १३ | महाव्यवस्थापक, नागपूर रेल्वे परिक्षेत्र | सदस्य |
| १४ | विभागीय आयुक्त, नागपूर | सदस्य |
| १५ | जिल्हाधिकारी, नागपूर | सदस्य |
| १६ | सचिव (नगर विकास विभाग) | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा :-</u>**

१. नियोजित आराखडा व त्यासाठी लागणाऱ्या खर्चास मंजूरी देणे.

२. आराखड्याच्या अंमलबजावणीचा वेळोवेळी आढावा घेणे.

ब) नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांनी सादर केलेल्या आराखड्याची छाननी करुन व त्यास लागणारा निधी यास अंतिम मान्यता घेण्यासाठी तो शिखर समितीकडे सादर करण्यासाठी तसेच विकास कार्यक्रमांच्या अंमलबजावणीवर संनियंत्रण ठेवण्यासाठी मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठित करण्यात येत आहे.

**जिल्हास्तरीय समिती**

| अ.क्र. | पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | नागपूर जिल्हयाचे मा.पालकमंत्री | अध्यक्ष |
| २ | जिल्ह्यातील संबंधित संसद सदस्य | सदस्य |
| ३ | जिल्ह्यातील संबंधित विधानसभा /विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ४ | विभागीय आयुक्त, नागपूर | सदस्य |
| ५ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | सदस्य |
| ६ | पोलीस महानिरीक्षक, नागपूर /पोलीस अधिक्षक, नागपूर | सदस्य |
| ७ | प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर विभाग, नागपूर | सदस्य |
| ८ | महाराष्ट्र राज्य विद्यूत वितरण कंपनीचे संबंधित अधिकारी, नागपूर विभाग, नागपूर | सदस्य |

| अ.क्र. | पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| ९ | विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ नागपूर विभाग, नागपूर | सदस्य |
| १० | जिल्हाधिकारी, नागपूर | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :**

१. नागपूर सुधार प्रन्यास यांनी तयार केलेल्या विकास आराखड्यास शिखर समितीची मान्यता घेण्यासाठी छाननी करुन शिफारस करणे.

२. विकास आराखड्याच्या किंमतीच्या मर्यादेत, सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत कोणताही बदल न करता, आराखडयातंर्गत इतर कामांकरिता मंजूर निधीच्या अंतर्गत समायोजन करण्याचे अधिकार समितीस असतील.

३. विकास आराखड्याच्या अनुषंगाने घ्यावयाच्या कामांचा वेळोवेळी आढावा घेणे.

४. सर्व संबंधित प्रशासकीय विभाग, केंद्र शासनाचे प्रशासकीय विभाग यांचेशी वेळोवेळी समन्वय साधून कामाच्या प्रगतीमध्ये येणाऱ्या अडी-अडचणी सोडविणे, संबंधितांना मार्गदर्शन करणे .

५. बैठकीसाठी आवश्यकतेनुसार कोणत्याही विभागाच्या अधिकाऱ्यास बोलविण्याचे अधिकार समितीस राहतील.

६. प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालमर्यादेत पूर्ण होईल याकरिता आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे.

३. शिखर समितीने मान्य केलेल्या आराखडयाच्या खर्चाच्या कमाल ८० टक्के भार शासनामार्फत उचलण्यात येईल.

४. शिखर समितीने मान्य केलेल्या आराखडयाच्या एकूण अंदाजित किंमतीपैकी देय शासन सहभागाकरीता नियोजन विभागाकडून नगर विकास विभागास उपलब्धतेनुसार अतिरीक्त नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येईल.

५. शासन पातळीवर सदर प्रकल्पाचे संनियंत्रण नगर विकास विभागाने करावे.

६. आराखडयाची अंमलबजावणी करतांना शिखर समितीच्या मान्यतेशिवाय मंजूर आराखडयाव्यतिरीक्त कोणतेही नवीन काम समाविष्ट करता येणार नाही.

७. सदर शासन निर्णय, नगर विकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६/नवि-२६ दिनांक ७ मे, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अभिप्रायानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८०/व्यय-३ दिनांक १९ मे, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२६१४४१२६७९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mugdha Nitin Dhuri

Digitally signed by Mugdha Nitin Dhuri
DN: CN = Mugdha Nitin Dhuri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.26 14:44:01 +05'30'

**मु.नि.धुरी**
उप सचिव

**प्रत,**

१) नागपूर जिल्हयातील संबंधित संसद सदस्य, विधानसभा,विधानपरिषद सदस्य
२) मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद, नागपूर
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
५) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१),मंत्रालय,मुंबई
७) सचिव,नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय,मुंबई
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
९) महाव्यवस्थापक, नागपूर रेल्वे परिक्षेत्र,नागपूर
१०) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
११) पोलीस महानिरिक्षक, नागपूर/पोलीस अधिक्षक, नागपूर
१२) जिल्हाधिकारी, नागपूर
१३) मा.सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
१४) मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव
१५) मा.मंत्री,ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा तथा पालकमंत्री नागपूर यांचे खाजगी सचिव
१६) मा.राज्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव
१७) प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर विभाग, नागपूर
१८) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्यूत वितरण कं., नागपूर विभाग, नागपूर
१९) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, नागपूर विभाग, नागपूर